दिनांक २६ जानेवारी २०२० - प्रजासत्ताक वर्धापन दिन समारंभात चित्ररथ संचलनासाठी येणाऱ्या खर्चास मंजुरी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: टिआरए-१२१९ /प्र.क्र.१२९/पोल-८**
**मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,**
**दिनांक:- २१ डिसेंबर, २०१९**

वाचा :

१) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र.सीईआर-२०१९/प्र.क्र.२१०/३०,दि. ६.१२.२०१९

२) सहआयुक्त पोलीस आयुक्त (वाहतुक) वरळी, मुंबई यांचे पत्र क्र. ५३४८२/ अपोआ /वा/ प्रजा. दिन/२०१९, दि.१८.१२.२०१९

**शासन निर्णय :-**

भारतीय प्रजासत्ताक ७० वा वर्धापन दिन दिनांक -२६ जानेवारी २०२० रोजी शिवाजी पार्क, दादर, मुंबई येथे संपन्न होणार आहे. सदर कार्यक्रमामध्ये मुंबई वाहतुक पोलीस यांच्यामार्फत **"जनतेमध्ये शिरस्त्रान (हेल्मेट) बाबत जनजागृती"** या विषयांचे चित्ररथाचे संचलन होणार आहे. तरी सदर चित्ररथाच्या संचलनासाठी येणारा खर्च रुपये १५,९३,०००/- (पंधरा लाख त्र्यान्नव हजार रुपये फक्त) इतक्या रक्कमेस शासन मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदर निधी आहरित करण्यासाठी सह पोलीस आयुक्त (वाहतूक), वरळी, मुंबई यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. या बाबीवर होणारा खर्च गृह विभाग मागणी क्र.बी- ०१, " २०५५ पोलीस, १०८ राज्य मुख्यालय पोलीस, (०२) शहर पोलीस, (०२)(०१), आस्थापना, -(२०५५००९७), २१ सामुग्री व पुरवठा " या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर चित्ररथ संचलनासाठी आवश्यक असलेल्या वस्तु व सेवा विकत वा भाडयाने घेताना, शासनाने विहीत केलेल्या कार्यपध्दतीच्या अवलंब करावा. तसेच चित्ररथ संचलनासाठी केलेल्या खर्चाचा संपूर्ण तपशील शासनास त्वरीत सादर करावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ मधील वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, भाग- पहिला, उपविभाग ३, अनुक्रमांक ४, परिच्छेद क्रमांक २७ (२) (अ) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तीचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२२१११११६४९७८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sudhakar Dhondu Pawar

Digitally signed by Sudhakar Dhondu Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=370693820257420609f4d474c2024d6ebdc571ea6ad2b769aa743bd3015cb5a3, serialNumber=ee05d69d6f5f431837c7addff9093dd5e97fd9ec63b0bc306c7f049f9d93d36c, cn=Sudhakar Dhondu Pawar
Date: 2019.12.21 11:48:17 +05'30'

**( सु.धो.पवार )**
**अवर सचिव, गृह विभाग**

**प्रति,**

१. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई
२. सह पोलीस आयुक्त (वाहतूक),वरळी, मुंबई.
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा वअनुज्ञेयता / लेखापरिक्षा ), मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. वित्त विभाग(कार्यासन व्यय-७/ विनियम), मंत्रालय, मुंबई.
६. अवर सचिव,( कार्यासन बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. निवडनस्ती / गृह विभाग (पोल-८)